कै.वसंतराव नाईक शेती स्वावलंबन मिशन, अमरावती कार्यालयाकरीता मुख्य मुख्य लेखाशीर्ष २२३५ अंतर्गत नव्याने लेखाशीर्ष उघडणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग (आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन)**
**शासन निर्णय क्रमांक- एससीवाय-२०२१/प्र.क्र.८३/म-७**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
**दिनांक:- १० नोव्हेंबर, २०२१**

**वाचा-एससीवाय-२०१५/प्र.क्र.२४४/म-७, दिनांक २४ ऑगस्ट, २०१५**

**प्रस्तावना :-**

कै.वसंतराव नाईक शेती स्वावलंबन मिशनच्या अध्यक्षांना देय मानधन व भत्ते विभागीय आयुक्त, अमरावती यांनी त्यांच्या आस्थापना खर्चाच्या तरतुदीतून द्यावयाच्या असल्याने सदरचा खर्च २०५३ ०४४९ या लेखाशीर्षाखाली करण्यात येतो. सदर लेखाशीर्षाखालील १०-कंत्राटी सेवा या उद्दिष्टाखाली कंत्राटी सेवेतील मिशनच्या कार्यालयातील कंत्राटी अधिकारी/कर्मचाऱ्यांचे वेतन देण्यात येत असून १३-कार्यालयीन खर्च या उद्दिष्टाखाली वाहनावरील तसेच इतर कार्यालयीन खर्च भागविण्यात येतो. मिशनच्या अध्यक्षांना देय मानधन व भत्ते विभागीय आयुक्त, अमरावती यांनी त्यांच्या आस्थापना खर्चाच्या तरतुदीतून द्यावयाच्या असल्याने सदरचे लेखाशीर्षाखाली मिशनचा खर्च भागविणेसाठी पुरवणी मागणीचा प्रस्ताव सादर करावा लागत असून वेळोवळी मिशनच्या कार्यालयास निधीचा पुरवठा करण्यास उशिर होत असल्याने मिशनचे अध्यक्ष तसेच त्यांच्या कार्यालयातील अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन व भत्ते देण्यास विलंब होतो. त्यामुळे कै.वसंतराव नाईक शेती स्वावलंबन मिशनचे अध्यक्ष व कार्यालयातील अधिकारी/कर्मचारी यांच्या वेतन व भत्ते यासाठी लागणाऱ्या निधीची तरतूद करण्याकरीता मुख्यलेखाशीर्ष २२३५ अंतर्गत एक नव्याने लेखाशीर्ष उघडण्यास वित्त विभागास विनंती करण्यात आली होती. वित्त विभागाने अनिवार्य खर्चांतर्गतचे नवीन लेखाशिर्ष उघडण्यास मान्यता दिली आहे. त्याचप्रमाणे नव्याने लेखाशीर्ष उघडण्याच्या प्रस्तावास प्रधान महालेखाकार (लेखा व हकदारी)-२, महाराष्ट्र, नागपूर यांनी त्यांच्या दिनांक २२ सप्टेंबर, २०२१ च्या पत्रान्वये देखील मान्यता प्राप्त झाली आहे. त्याअनुषंगाने कै.वसंतराव नाईक शेती स्वावलंबन मिशन, अमरावती कार्यालयाकरीता मुख्य मुख्य लेखाशीर्ष २२३५ अंतर्गत नव्याने लेखाशीर्ष उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

कै.वसंतराव नाईक शेती स्वावलंबन मिशन, अमरावती कार्यालयाकरीता मुख्य मुख्य लेखाशीर्ष २२३५ अंतर्गत नव्याने लेखाशीर्ष पुढीलप्रमाणे उघडण्यास शासन मान्यता देत आहे.

| लेखाशीर्ष | Budget Head |
|---|---|
| मागणी क्रमांक : सी-५,<br>२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण,<br>०२ - समाजकल्याण ,<br>१०४- वृध्द, विकलांग व निराश्रीत व्यक्तींचे कल्याण<br>(००) (०६) कै.वसंतराव नाईक शेती स्वावलंबन मिशन, अमरावती (अनिवार्य) (२२३५सी ५२८)<br>१०-कंत्राटी सेवा<br>१३-कार्यालयीन खर्च<br>२४- तेल व वंगण<br>२६- जाहीरात व प्रसिध्दी | Demand No. C-5<br>2235 , Social Security and Welfare<br>02 , Social Welfare ,<br>104 , Welfare of aged, infirm and destitute<br>(00)(06) Late Vasantrao Naik Sheti Swavlamban Mission, Amravti (Committed) (2235C528)<br>10-Contract Services<br>13-Office Expenses<br>24-Petrol, Oil & Lubricant<br>26-Advertising & Publicity |

२. कै.वसंतराव नाईक शेती स्ववलंबन मिशन, अमरावती कार्यालयाकरीता नव्याने उघडण्यात आलेल्या लेखाशीर्षाच्या आर्थिक बाबींचे संनियंत्रण (नियंत्रण अधिकारी व आहरण व संवितरण अधिकारी (DDO) सहित) सध्याच्या प्रचलित कार्यपध्दतीनुसार विभागीय आयुक्त कार्यालय, अमरावती यांच्यामार्फत करण्यात या

३. सदरहू शासन निर्णय, महालेखाकार (लेखा व हकदारी)-२, महाराष्ट्र, नागपूर यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.टिएम/जीआर-३/अनौसं-१०/४२८, दि.२२/०९/२०२१, व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ४४७/व्यय०९/२०२१ दि.१०/११/२०२१ रोजी दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२१११११२३७१५९२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Digitally signed by Sanjay Audumbar Dharurkar
Date: 2021.11.11 12:39:34 +05'30'

**( संजय औ.धारुरकर )**
**उप सचिव महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव.

२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव.
३. मा.मंत्री (म. व पु.) यांचे खाजगी सचिव,
४. मा.राज्यमंत्री (म. व पु.) यांचे खाजगी सचिव,
५. मा.अध्यक्ष, कै.वसंतराव नाईक शेती स्वावलंबन मिशन, अमरावती
६. प्रधान सचिव (म. व पु.) यांचे स्वीय सहाय्यक,
७. विभागीय आयुक्त, अमरावती,
८. महालेखापाल-१/२(लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षण), महाराष्ट्र राज्य,मुंबई / नागपूर
९. संचालक, लेखा व कोषागारे
१०.वित्तीय सल्लागार व सह सचिव , महसूल व वन (म.व पु.) विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.वित्त विभाग (अर्थसंकल्प- ६/व्यय-९), मंत्रालय,मुंबई-३२,
१२.कार्यासन अधिकारी (ब-१), मंत्रालय, मुंबई-३२,
१३.निवडनस्ती ( कार्यासन म-७).